सार्वजनिक बांधकाम विभागातील वास्तुशास्त्रज्ञ संवर्गाची दि.०१.०१.२०२५ रोजीची तात्पुरती ज्येष्ठतासूची.

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांक :- ज्येष्ठता-२०२४/प्र.क्र.६६/आस्था-१**
**मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,**
**मंत्रालय, मुंबई ४०००३२.**
**दिनांक :- ०८/०४/२०२५**

**शासन परिपत्रक :-**

महाराष्ट्र नागरी सेवा (ज्येष्ठतेचे विनियमन) नियमावली, २०२१ मधील तरतुदींच्या अनुषंगाने सार्वजनिक बांधकाम विभागातील वास्तुशास्त्रज्ञ संघटनेतील वास्तुशास्त्रज्ञ गट-अ संवर्गाची दि.०१.०१.२०२५ रोजीची तात्पुरती ज्येष्ठतासूची यासोबत जोडलेल्या **परिशिष्ट-अ** प्रमाणे प्रसिध्द करण्यात येत आहे.

२. महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने सार्वजनिक बांधकाम विभागांतर्गत वास्तुशास्त्रज्ञ गट-अ पदासाठी घेण्यात आलेल्या परीक्षेचा दिनांक २०.१०.२०२१ रोजी जाहीर केलेल्या निकालानुसार शिफारस केलेल्या श्रीमती कांचन भिमाशंकर चकोर, श्रीमती कल्याणी मुकुंदराव मंचलवार व श्रीमती श्वेता प्रमोद आहेरराव यांची वास्तुशास्त्रज्ञ गट-अ पदावर नियुक्ती करण्यात आली असून त्यांचा परिविक्षाधीन कालावधी अद्याप समाप्त झाला नसल्याने त्यांच्या नावाचा समावेश सदर दि.०१.०१.२०२५ रोजीच्या तात्पुरत्या ज्येष्ठता यादीमध्ये करण्यात आलेला नाही.

३. सदरचे परिपत्रक मुख्य वास्तुशास्त्रज्ञ, महाराष्ट्र राज्य, (सा.बां.), मुंबई यांनी **"परिशिष्ट-अ"** मधील वास्तुशास्त्रज्ञांच्या तात्काळ निदर्शनास आणावे, तसे कळविल्याबाबत त्यांची स्वाक्षरी घेतलेली पोच स्वत:च्या अभिलेल्यात जतन करुन ठेवावी. शासनास आवश्यकता भासल्यास सदरची पोच शासनास उपलब्ध करुन देणे ही संबंधित कार्यालयाची जबाबदारी राहील.

४. मा. उच्च न्यायालय, मुंबई यांनी याचिका क्रमांक २७९७/२०१५ मध्ये दिनांक ०४.०८.२०१७ रोजी दिलेल्या निर्णयान्वये पदोन्नतीमधील आरक्षण अवैध ठरविले आहे. मा. उच्च न्यायालयाच्या निर्णयाविरोधात राज्य शासनाने मा. सर्वोच्च न्यायालयात विशेष अनुज्ञा याचिका क्र. २८३०६/२०१७ दाखल केली आहे. सदर याचिका अद्याप प्रलंबित आहे. याबाबत विधी व न्याय विभाग व सामान्य प्रशासन विभागाचे अभिप्राय विचारात घेता शासन निर्णय दिनांक २५.०५.२००४ वर आधारीत आरक्षणावरील पदोन्नत्यांच्या अनुषंगाने ज्येष्ठता सूची प्रसिध्द करता येणार नाही. अन्यथा मा. उच्च न्यायालयाच्या निर्णयाचा अवमान होईल. यास्तव, मा.उच्च न्यायालयाने याचिका क्र.२७९७/२०१५ वर दिलेल्या न्यायनिर्णयानुसार तसेच, यासंदर्भात मा.सर्वोच्च न्यायालयामध्ये दाखल केल्या गेलेल्या व प्रलंबित असलेल्या विशेष अनुज्ञा याचिका क्र.२८३०६/२०१७ वरील अंतिम न्यायनिर्णयाच्या अधीन राहून वास्तुशास्त्रज्ञ गट-अ संवर्गाची दिनांक ०१.०१.२०२५ रोजीची तात्पुरती ज्येष्ठता यादी प्रसिध्द करण्यात येत आहे. उपरोक्त न्यायालयीन प्रकरणांमधील न्यायनिर्णयानुसार सन २००४ नंतरच्या निवडयाद्यांमध्ये बदल झाल्यास त्यानुसार ज्येष्ठतायादीमध्ये बदल करण्यात येतील.

५. सदर ज्येष्ठता यादीत अंतर्भूत केलेल्या वास्तुशास्त्रज्ञ यांच्या तपशिलामध्ये जसे नाव, जन्म दिनांक, नियुक्ती दिनांक, जात प्रवर्ग व ज्येष्ठतेचे स्थान इत्यादी बाबत काही चुका/त्रुटी आढळल्यास, त्या हे परिपत्रक निर्गमित झाल्याच्या दिनांकापासून १५ दिवसांच्या आत लेखी स्वरुपात आवश्यक त्या योग्य कागदोपत्री पुराव्यासह ई-मेल द्वारे (doest1.pwd@maharashtra.gov.in) /रजिस्टर्ड पोस्टाद्वारे /स्पीड पोस्ट द्वारे / हस्त बटवडयाद्वारे आपली निवेदने/हरकती/सूचना शासनाच्या निदर्शनास आणाव्यात. विहीत वेळेत लेखी स्वरुपात चुका/त्रुटी शासनाच्या निदर्शनास न आणल्यास, त्याबाबत आपले काही आक्षेप नाही, असे समजून वास्तुशास्त्रज्ञ संवर्गाची दि.०१.०१.२०२५ रोजीची अंतिम ज्येष्ठता यादी प्रसिध्द करण्यात येईल.

६. सदरचे शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा सांकेतांक २०२५०४०८१८५२१८६०१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

**सोबत :- परिशिष्ट “अ”**

RANJIT SHIVAJIRAO AHIRE

Digitally signed by RANJIT SHIVAJIRAO AHIRE
DN: CN = RANJIT SHIVAJIRAO AHIRE, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = PUBLIC WORKS DEPARTMENT
Date: 2025.04.08 18:54:00 +05'30'

**(रणजित शि. अहिरे)**
**अवर सचिव,महाराष्ट्र शासन**

**प्रत:-**

१. मुख्य वास्तुशास्त्रज्ञ, महाराष्ट्र राज्य, (सा.बां.), मुंबई,
२. मा.अ.मु.स. (सा.बां.वि.) यांचे स्वीय सहायक,सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
३. सचिव (रस्ते/ बांधकामे) सा .बां.वि. यांचे स्वीय सहायक,सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. परिशिष्ट “अ” मधील सर्व वास्तुशास्त्रज्ञ, द्वारा- मुख्य वास्तुशास्त्रज्ञ, महाराष्ट्र राज्य, (सा.बां.), मुंबई,
५. कक्ष अधिकारी सेवा-१/सेवा- २/आस्था-३, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. निवडनस्ती, आस्थापना-१.

| सार्वजनिक बांधकाम विभाग, शासन परिपत्रक क्रमांक ज्येष्ठता-२०२५/प्र.क्र.२० /आस्था-१, दिनांक ०८/०४/२०२५ | | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| परिशिष्ट-अ | | | | | | | | | |
| संवर्गाचे नाव:- वास्तुशास्त्रज्ञ | | | | | | | | | |
| वेतनश्रेणी:- एस-२० (रु.५६१००-१७७५००) | | | | | | | | | |
| वास्तुशास्त्रज्ञ संवर्गाची दिनांक ०१.०१.२०२५ रोजीची तात्पुरती ज्येष्ठता यादी. | | | | | | | | | |
| नियम ३ (२) (ब) नुसार ज्येष्ठता क्रमांक | शासकीय कर्मचाऱ्याचे नाव | संबंधित पदावरील नियुक्तीचा मार्ग | जन्म दिनांक (दिनांक-महिना-वर्ष) | प्रवर्ग | नियम ३ (२) (अ) नुसार संवर्गात प्रत्यक्ष रुजू दिनांक | ज्येष्ठतेचा दिनांक | सेवानिवृत्तीचा दिनांक (दिनांक-महिना-वर्ष) | शैक्षणिक अर्हता | शेरा |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ | १० |
| १ | श्री.भारत मोतीराम मोटघरे | पदोन्नती | ३०-१२-१९६८ | अ.जा. | ०८-१२-२००४ | ०८-१२-२००४ | ३१-१२-२०२६ | बी.आर्च. | वरिष्ठ वास्तुशास्त्रज्ञ पदावर ज्येष्ठतेनुसार निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात नियमित पदोन्नत. |
| २ | श्रीमती अनघा विलास खरे | सरळसेवा | २९-०५-१९६८ | खुला | ०६-०८-२०११ | ०६-०८-२०११ | ३१-०५-२०२६ | बी.टेक होम सायन्स IV / इंडियन इन्स्टिटयूट ऑफ आर्किटेक्चर द्वारा घेण्यात आलेली परिक्षा उत्तीर्ण (बी.आर्च. समकक्ष) | वरिष्ठ वास्तुशास्त्रज्ञ पदावर ज्येष्ठतेनुसार निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात नियमित पदोन्नत. |
| ३ | श्री. विजय काशिनाथ शेवरे | पदोन्नती | ०१-०६-१९६८ | अ.ज. | १०-०८-२०११ | १०-०८-२०११ | ३१-०५-२०२६ | बी.आर्च. | वरिष्ठ वास्तुशास्त्रज्ञ पदावर ज्येष्ठतेनुसार निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात नियमित पदोन्नत. |
| ४ | श्रीमती अनिषा अमुल वाघवसे | पदोन्नती | २०-०६-१९७० | खुला | २४-०९-२०१५ | २४-०९-२०१५ | ३०-०६-२०२८ | बी.आर्च. | वरिष्ठ वास्तुशास्त्रज्ञ पदावर ज्येष्ठतेनुसार निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात नियमित पदोन्नत. |
| ५ | श्रीमती माधुरी किशोर हेंडवे | पदोन्नती | ०६-०७-१९७६ | अ.जा. (खुला) | १२-०४-२०१७ | १२-०४-२०१७ | ३१-०७-२०३४ | बी.आर्च. | |
| ६ | श्री.निनाद भिमराव भंडारे | पदोन्नती | २०-०५-१९७४ | अ.जा. (खुला) | ०५-०४-२०१८ | ०५-०४-२०१८ | ३१-०५-२०३२ | बी.आर्च. | |

सार्वजनिक बांधकाम विभाग, शासन परिपत्रक क्रमांक ज्येष्ठता-२०२५/प्र.क्र.२० /आस्था-१, दिनांक ०८/०४/२०२५

परिशिष्ट-अ

संवर्गाचे नाव:- वास्तुशास्त्रज्ञ

वेतनश्रेणी:- एस-२० (रु.५६१००-१७७५००)

वास्तुशास्त्रज्ञ संवर्गाची दिनांक ०१.०१.२०२५ रोजीची तात्पुरती ज्येष्ठता यादी.

| नियम ३ (२) (ब) नुसार ज्येष्ठता क्रमांक | शासकीय कर्मचाऱ्याचे नाव | संबंधित पदावरील नियुक्तीचा मार्ग | जन्म दिनांक (दिनांक-महिना-वर्ष) | प्रवर्ग | नियम ३ (२) (अ) नुसार संवर्गात प्रत्यक्ष रुजू दिनांक | ज्येष्ठतेचा दिनांक | सेवानिवृत्तीचा दिनांक (दिनांक-महिना-वर्ष) | शैक्षणिक अर्हता | शेरा |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ | १० |
| ७ | श्रीमती शिल्पा न.कडू | पदोन्नती | ३०-०६-१९७८ | इ.मा.व. | ०५-०४-२०१८ | ०५-०४-२०१८ | ३०-०६-२०३६ | बी.आर्च. | |
| ८ | श्री.हर्षद तुळशीराम साळुंके | पदोन्नती | ०७-१२-१९७९ | इ.मा.व. | ०३-११-२०१८ | ०३-११-२०१८ | ३१-१२-२०३७ | बी.आर्च. | |
| ९ | श्री.समीर सुरेश गांगण | पदोन्नती | ०४-०६-१९७७ | खुला (इ.मा.व.) | ०३-११-२०१८ | ०३-११-२०१८ | ३०-०६-२०३५ | बी.आर्च. | |
| १० | श्रीमती किरण अनिकेत केने | पदोन्नती | १७-०७-१९७३ | इ.मा.व. | ०६-११-२०१८ | ०६-११-२०१८ | ३१-०७-२०३१ | बी.आर्च. | |
| ११ | श्री. समिर बंडोपंत यादव | पदोन्नती | १०-१२-१९७६ | भ.ज. (ब) | १५-११-२०१८ | १५-११-२०१८ | ३१-१२-२०३४ | बी.आर्च. | |